# किटकांचा सापळा

## किटक खाणाऱ्या वनस्पती



लेखक: मार्टीन जेनकिन्स    चित्रे: डेव्हिड पार्किन्स

# किटकांचा सापळा

मराठी अनुवादः सुशील मेन्सन



# किटकांचा सापळा

## किटक खाणाऱ्या वनस्पती



लोक फावल्या वेळात बऱ्याच गोष्टी करत असतात. काही लोक मातीची भांडी गोळा करतात तर काही बाटल्यांच्या झाकणांपासून प्राण्यांच्या प्रतिकृती बनवतात.

काही लोक किडे, किटक शोधतात....





आणि काही मोठ्या-मोठ्या रोपट्यांची लागवड करतात....

मला मांसभक्षक रोपटी न्याहाळत बसायला आवडतं. ही रोपटी छोटे किटक खातात.





माझा हा छंद तेव्हा सुरू झाला जेव्हा मला तळ्यात एक रोपटं दिसलं. त्याची पिवळी फुलं पाण्याच्या वर आली होती.





पाण्याखाली असलेली त्याची मुळं एकमेकांत गुंतलेली होती. त्यांच्यावर शेकडो सूक्ष्म बुडबुडे दिसत होते. एका मित्राने मला सांगितलं की त्या रोपट्याचं नाव *ब्लॅडरवर्ट* आहे.



त्याने सांगितलं की मुळांवरचा प्रत्येक बुडबुडा ही एक पिशवी असते. प्रत्येक पिशवीला झट्कन बंद होणारं एक दार असतं. त्याच्या सभोवती संवेदनशील छोटे केस असतात.



जेव्हा पाण्यातला पिसू वा एखादा किडा या केसांना स्पर्श करतो तेव्हा पिशवीचं दार लगेच उघडतं आणि किडा आत खेचला जातो.



मग पिशवीचं दार बंद होतं आणि किड्याला बुडबुड्यातून बाहेर पडायला कोणताच मार्ग उरत नाही. पापणी लवते तेवढ्या वेळात हे सारं घडून येतं.



मला ते रोपटं खूप चलाख असल्यागत वाटलं. पण एक खंत होती, रोपट्याचे हे सापळे इतके लहान होते की ते काम कसं करतात, हे मी पाहू शकत नव्हतो. मग मी ठरवलं की आपण एक मोठं मांसभक्षक रोपटं शोधूया. मी ते शोधायला बाहेर पडलो.



त्यासाठी मला एका डोंगरावर चढावं लागलं, चिखल आणि मॉस असलेल्या दलदलीतून चालावं लागलं. या मॉसमध्ये छोटी छोटी लाल लाल रोपटी होती. ती उन्हात चमकत होती. मला आधी वाटलं की त्यावर दवबिंदू साचलेयत. पण तसं नव्हतं. ती *सनड्यू* वनस्पतीचे सापळे होते, मधासारखे चिकट चिकट!



चिकट का होते ते?

तुम्ही नक्कीच याचा अंदाज लावू शकता.

तेवढ्यातच ढग दाटून आले आणि मी सनड्यू रोपटी सोडून घरी निघालो. पण घरी पोहोचल्यावर मी माझ्यासाठी सनड्यू रोपट्याची काही बीजं मागवली.



ती बीजं साधारण सनड्यू रोपट्याची नव्हती. ती महाकाय आफ्रिकी सनड्यू रोपट्याची होती. मी ती बीजं मॉसने भरलेल्या कुंडीत रुजवली आणि कुंडीवर झाकण लावलं. मी दररोज त्यांना पावसाचं पाणी घालू लागलो.

लवकरच बीजं अंकुरीत झाली आणि माझ्याकडे डझनभर सनड्यू रोपटी झाली. ती वाढू लागली आणि एवढी मोठी झाली की भक्ष पकडायला सक्षम बनली.





पण एक दिवस मी त्यांना चुकीचं पाणी घातलं. त्यानंतर सगळी रोपटी मरून गेली.

मग मी सनड्यू रोपट्यांचा विचार सोडून दिला. नंतर मी *व्हिनस फ्लायट्रॅप* नावाचं एक मांसभक्षक रोपटं रुजवलं. ते मी आमच्या खिडकीवर ठेवलं. ते किडे पकडू लागलं. त्याच्या प्रत्येक पानाच्या मध्यावर बीजागर आणि त्याच्या सभोवती असंख्य संवेदनशील सूक्ष्म केस होते. पानाच्या कडा टोकदार होत्या.

एखादी माशी किंवा किंटक पानावर चालत असताना पानाच्या केसांना स्पर्श न करेपर्यंत सुरक्षित असे. माशी वा किटकाने पानावरच्या एखाद्या केसाला स्पर्श केला तरीही ते सुरक्षित राहात असे. पण जर त्याने पानाच्या दोन केसांना स्पर्श केला तर ते....



क्षणात पकडले जात.



माझं व्हिनस फ्लायट्रॅपचं रोपटं चांगलंच उगवलं. मग मी त्याच्यापेक्षाही मोठं काही उगवायचं ठरवलं.

मग मला *कोब्रा लिली* नावाचं रोपटं मिळालं.



कोब्रा लिलीसुद्धा किडे पकडत असे, पण फारसं नाही. तिला नरसाळ्यांसारखी दिसणारी पानं होती. तिच्या पानांचे काठ गुळगुळीत होते आणि त्यांच्या तळाशी एक छोटा डोह होता. एखादा किडा पानावर चालू लागला की तो घसरून डोहात पडत असे आणि मग बाहेर पडू शकत नसे. त्यामुळे तो तिथेच पडून राहात असे आणि अखेरीस, लिलीसाठी सूप बनत असे.

मला कोब्रा लिलीचं रोपटं भयंकर आवडलं. ते सर्वात मोठं मांसभक्षक रोपटं होतं. पण मग माझ्या मित्राने मला *पिचर* रोपट्याबद्दल सांगितलं. पिचर रोपटी यापेक्षाही मोठी असतात, पण ती उगवणं, त्यांना वाढवणं कठीण काम असतं. मग मी काही रानटी रोपटी शोधून आणायचा विचार केला.



म्हणून मग मी –

रोपट्यांचा शोध घेत थेट मलेशियाला पोहोचलो.



तिथे, जंगलाच्या सीमेवर असलेल्या झाडांवर शेकडो पिचर रोपटी होती. लाल जाडजूड, बारीक पिवळी, हिरवी कुरळी पिचर रोपटी. सगळे माशांची वाट बघत होते.



तरीही मला सर्वात मोठं पिचर रोपटं बघायला मिळालं नाही. लोक त्याला *राजा पिचर प्लांट* म्हणतात. ते 4000 मी. उंचीवर असलेल्या *किनाबाला* पर्वतावर उगवतं. तो बोर्नियो बेटावरील सर्वात उंच पर्वत आहे. तिथे फुटबॉलसारखी मोठी पिचर रोपटी उगवतात. लोक म्हणतात की पिचर रोपटी एका विशिष्ट प्रकारची खारही पकडू शकते. पण मला ते खरं वाटलं नाही. .


एखाद दिवशी जाऊन खात्री
करून घेईन....

# किटक सापळे रोपट्यांबद्दल आणखी माहिती

जगात शेकडो प्रकारच्या मांसभक्षक वनस्पती आहेत आणि त्या जगभरात सर्वत्र आढळून येतात.

कोब्रा लिली हे नाव त्या वनस्पतीची पानं कोब्रा सापाच्या फण्यासारखी दिसतात म्हणून पडलं आहे, साप त्यांना खातात म्हणून नव्हे. ही वनस्पती उत्तर अमेरिकेतून आली आहे. तिची पानं 45 सेमी उंच वाढू शकतात.



जगात 200 वेगवेगळ्या प्रकारचे ब्लॅडरवर्ट आढळतात. बऱ्याचदा ते तलावात वा नदीत वाढतात. ते आकाराने लहान असतात. त्यांची पानं आणि देठ बारीक असतात. आपला सापळा सज्ज ठेवण्यासाठी, ब्लॅडरवर्ट त्यातलं पाणी बाहेर फेकतात.



जेव्हा सापळा उघडतो, तेव्हा पाणी आत शिरतं आणि त्यासोबतच किडाही आत खेचला जातो. ब्लॅडरवर्टमध्ये खास रसायनं तयार होतात. त्यात किडा विरघळतो आणि रोपटं त्याचा रस शोषून घेतं.

जगभरात सर्वत्र 80 प्रकारची सनड्यू रोपटी आढळतात. यांत महाकाय आफ्रिकी सनड्यू हे सर्वात मोठे असतात. त्यांची पानं 45 सेमी लांब वाढू शकतात.




एखादा किडा सनड्यूमध्ये अडकतो, तेव्हा हळूहळू त्याची पानं किड्याला सर्व बाजुंनी वेढा घालतात. मग किड्याचे मऊ तुकडे रसायनात विरघळतात आणि रोपटं त्यांना खाऊन टाकतं. नंतर, पान पुन्हा उघडतं आणि किड्याचा उरलेला अवशेष खाली पडतो.



बटरवर्ट हे प्राणी खाणारं रोपटं आहे. सनड्यू वाढतात त्याच ठिकाणी ते वाढतं. त्याची पानं फ्लायपेपरसारखी चिकट आणि चपटी असतात. छोटे किटक या पानांना चिकटतात आणि हळूहळू विरघळून जातात.



व्हिनस फ्लायट्रॅप फक्त उत्तर अमेरिकेच्या एका छोट्याशा भागात वाढते. ही वनस्पती आता दुर्मीळ झाली आहे, कारण ज्या दलदलीत ती दिसत असे ती दलदल लोकांनी खणून टाकली आहे.



मुंग्यांसारखे छोटे किटक व्हिनस वनस्पतीच्या सापळ्यातून निसटू शकतात. कारण ते इतके छोटे असतात. की खाण्यालायक



नसतात. पण माशा आणि किटक मुंग्याहून वेगळ्या असतात. एकदा सापळ्यात अडकल्यावर, ते सुटकेचा जेवढा प्रयत्न करतात तेवढीच पाने अधिकाधिक घट्ट मिटली जातात. पान पूर्ण बंद झालं की ते आपले भक्ष्य विरघळवू लागते.

पिचर वनस्पती उष्णकटिबंधीय देशांमध्ये आढळतात. इतर बहुतेक प्राणीभक्षक वनस्पतींसारखं या वनस्पतीसुद्धा नापीक किंवा ओसाड जमिनीवर वाढतात. पिचर वनस्पतीची पानं फुलदाणीसारखी दिसतात. ती कोब्रा लिलीसारखं किडे पकडते. काही विशिष्ट प्रकारचे कोळी आणि छोटे बेडूक पिचर वनस्पतीत जिवंत राहू शकतात. ते कडांच्या गुळगुळीत बाजूंना चिकटतात आणि आत पडणाऱ्या किटकांना खाऊन टाकतात.

